दै. महाराष्ट्र टाईम्स
शनिवार दि. २ जून २०१८



# 'स्वामी दरियाचे' तुळाजी आंग्रे

परंपरा आरमाराची भाग ९

अनिकेत यादव



कान्होजी आंग्रे यांच्या निधनानंतर त्यांच्या मुलांनी, विशेषतः संभाजी आंग्रे यांनी अतुलनीय पराक्रम गाजविला. मात्र, कान्होजी आंग्रे यांचा दुसरा मुलगा व संभाजी आंग्रे यांचा सावत्र भाऊ 'तुळाजी' यांनी पराक्रमाची शर्थ केली. ज्या आरमाराचा पाया छत्रपती शिवाजी महाराजांनी अत्यंत दूरदृष्टीने घातला, त्याच पायावर कान्होजी आंग्रे यांनी आपल्या ४० वर्षांच्या कारकिर्दीत भली मोठी इमारत उभी केली आणि तुळाजी आंग्रे यांनी आपल्या १४ वर्षांच्या कारकिर्दीत या इमारतीवर मराठ्यांचे निशाण मोठ्या डौलाने फडकवत ठेवले. संभाजी आंग्रे यांच्या इ. स. १७४२मध्ये झालेल्या अकाली निधनानंतर आपल्या पारंपरिक आरमारी शत्रूंनी पुन्हा डोके वर काढले आणि दुर्दैवाने त्या शत्रूंना आता आपल्याच लोकांची साथ होती. संभाजी आंग्रे यांना मुलगा नसल्याने त्यांच्या सतत जवळ असणारे त्यांचे सावत्र भाऊ तुळाजी आंग्रे यांनी त्यांच्या दौलतीचा कारभार आपल्या हातात घेतला. मात्र, त्यांना 'सरखेल' पद देण्यास बऱ्याच जणांचा विरोध होता.

या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी छत्रपती शाहूंनी (छत्रपती संभाजी महाराजांचे पुत्र) तुळाजीने जर सिद्दीडील अंजनवेल व गोवळकोट हे किल्ले घेतले, तर त्यांस सरखेलपद देण्याची घोषणा केली. त्या वेळी कोणालाही सहजासहजी जिंकून घेता न आलेले हे दोन किल्ले अत्यंत धाडसाने व चातुर्याने तुळाजी आंग्रे यांनी जिंकून घेतले.

तुळाजीने केवळ लढाईतच मर्दुमकी गाजविली नाही, तर आरमारामध्येदेखील आवश्यक ते बदल केले. त्यांच्या ताब्यातील बंदरे भरभराटीस येऊन रयतही सुखी झाली होती. तुळाजींचे वैभव परमोच्च कोटीला जाऊन पोचले होते, शत्रूंवर त्यांचा दरारा निर्माण झाला होता आणि ते खऱ्या अर्थाने 'स्वामी दरियाचे' झाले होते. मात्र, हा सर्व पराक्रम करतानाच तुळाजींनी अनेक शत्रू निर्माण केले होते. इ. स. १७४९ मध्ये छत्रपती थोरले शाहू महाराजांच्या निधनानंतर स्वराज्यातील अनेक मोठे सरदार तुळाजी आंग्रेविरोधात उभे राहिले. तुळाजी आंग्रे शरण आल्यावर त्यांना कैद करून विसापूर किल्ल्यावर ठेवण्यात आले. सुमारे ३० वर्षे ते पेशव्यांच्या कैदेत होते. इ. स. १७८६मध्ये सातारा येथील वंदन किल्ल्यावर कैदेत असताना त्यांचा शेवट झाला. तात्पर्य, जगाच्या नकाशावर ठिपक्यांएवढे दिसणाऱ्या युरोपीय देशांनी आपल्यावर राज्य केले, ते केवळ त्यांच्याकडे असणारी दूरदृष्टी, कल्पकता, नावीन्याचा ध्यास व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे राष्ट्रनिष्ठा यांमुळे! आपण देखील त्यांचे हे गुण अंगी बाळगूयात व जात-धर्म-पंथ यांपलीकडे जाऊन राष्ट्रनिर्माणाचा ध्यास घेऊ या. (समाप्त)

ताई, काल ऊनपाऊस होता ना, तेव्हा आमच्या गच्चीवरून इतकं छान
वर्तवली आहे.' सावनी